अनुसूचित क्षेत्रातील (Scheduled Area) गट "अ" व गट "ब" मधील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित/पुनर्विलोकन करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रदान करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २७१५/प्र.क्र.१८/१३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १५ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

(१) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र.सीएफआर-१२६४-डी, दि.१८ फेब्रुवारी.१९६४.
(२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र.सीएफआर-१२६४-डी, दि.३० जून,१९६४.
(३) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. सीएफआर-१०८७/४६९/१३, ५ जून,१९८७.
(४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि, क्र. सीएफआर-१२९२/४५४/१३,दिनांक ११ सप्टेंबर,१९९२
(५) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र. सीएफआर-१२९५/प्र.क्र ६६/तेरा, दि. २२ नोव्हेंबर, २०१०
(६) शासन निर्णय, सा.प्र.वि, क्र. सीएफआर-१२१०/ प्र.क्र.४७/ २०१०/ तेरा, दि.१ नोव्हेंबर, २०११

प्रस्तावना -

जिल्हास्तरीय शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहीताना कशाप्रकारे कार्यवाही करावी याबाबत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सूचना दिलेल्या असून त्यातील संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयातील सूचना क्रमांक ५२ पुढील प्रमाणे आहे :-

*" जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल जिल्हाधिकाऱ्यांनी लिहू नयेत. मात्र, त्यांनी त्यांच्या जिल्हयातील राज्य स्तरावरील प्रत्येक अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण कामाबद्दलचे मूल्यांकन स्वत: करावे. तसा मूल्यांकन अहवाल प्रत्येक वर्षाच्या १५ एप्रिल पूर्वी तसेच, त्यांची ज्या जिल्हयातून बदली होण्याच्या वेळी, जर यापूर्वी पाठविलेल्या अहवालानंतर ३ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी त्यांनी कर्मचाऱ्यांचे/अधिकाऱ्यांचे काम पाहिले असेल तर संबंधित विभाग प्रमुखांकडे गोपनीयरित्या पाठवून त्याची प्रत त्या त्या प्रशासकीय विभागाच्या सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव यांच्याकडे पाठवावी."*

२. परंतु वरील सूचना असताना सुद्धा आदिवासींच्या प्रगतीकरीता आवश्यकतेप्रमाणे जिल्हाधिकाऱ्यांकडून देण्यात येणाऱ्या निदेशांचे शासकीय विभागांच्या जिल्हा स्तरावरील अधिकाऱ्यांकडून प्रभावीपणे उपाय केले जात नसल्याचे जाणवते. म्हणून अनुसूचित क्षेत्रामध्ये देण्यात येणाऱ्या विविध सेवा-सुविधांच्या दर्जामध्ये सुधारणा करणे, अनुसूचित क्षेत्रामध्ये आदिवासींच्या शैक्षणिक विकासास गती देणे, अनुसूचित क्षेत्रात कर्मचारी वृंदाच्या वारंवार गैरहजर राहण्यामुळे निर्माण होणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्याच्या हेतुने आणि अनुसूचित क्षेत्रामध्ये रहाणाऱ्या आदिवासींच्या कल्याण व प्रगती करिता शासनामार्फत राबविण्यात येणारे महत्वाचे कार्यक्रम आणि योजनांच्या अमंलबजावणीच्या दर्जात सुधारणा करण्याकरीता त्या क्षेत्रात कार्यरत असलेल्या गट-"अ" व गट-"ब" संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित आणि पुनर्विलोकन करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्याबाबत प्रस्ताव विचाराधीन होता. अनुसूचीत क्षेत्रातील गट "अ" व गट "ब" संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदीत आणि पुनर्विलोकन करण्याबाबत पुढील प्रमाणे सुधारीत सूचना या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत.

## शासन निर्णय -

अनुसूचित क्षेत्रातील महसूल विभाग, गृह विभाग व जिल्हा परिषद यामधील अधिकारी वगळून अन्य विभागामध्ये कार्यरत असलेले गट "अ" आणि गट "ब" संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित/ पुनर्विलोकन करण्याचे अधिकार संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

(१) अनुसूचित क्षेत्रातील महसूल विभाग, गृह विभाग व जिल्हा परिषदांमधील अधिकारी वगळून उर्वरित शासकीय विभागातील अनुसूचित क्षेत्रात कार्यरत असलेल्या गट "अ" संवर्गातील अधिकाऱ्यांनी त्यांचे स्वयंमूल्यनिर्धारण अहवाल जिल्हाधिकारी यांच्याकडे सादर करावे. जिल्हाधिकारी यांनी त्यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित करुन संबंधित अधिकाऱ्यांचे पुनर्विलोकन अधिकारी यांच्याकडे पुनर्विलोकनासाठी पाठवावेत.

(२) अनुसूचित क्षेत्रातील महसूल विभाग, गृह विभाग व जिल्हा परिषदांमधील अधिकारी वगळून उर्वरित शासकीय विभागातील गट "ब" संवर्गातील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल त्या त्या विभागातील प्रतिवेदन अधिकारी/नियंत्रण अधिकारी यांनी प्रतिवेदित करुन जिल्हाधिकारी यांच्याकडे पुनर्विलोकनासाठी सादर करावेत.

(३) सदरहू आदेशाची अंमलबजावणी सन २०१५-१६ या वर्षापासून करण्यात यावी.

(४) अनुसूचित क्षेत्रामधील महसूल विभाग, गृह विभाग व जिल्हा परिषदांमधील अधिकारी वगळून उर्वरित शासकीय विभागामध्ये कार्यरत असलेले गट "अ" संवर्गातील अधिकारी यांचे पुनर्विलोकन अधिकारी कोण आहेत याची माहिति संबंधित विभागांनी जिल्हाधिकारी यांना कळवावी.

(५) राज्यातील अनुसूचित क्षेत्राची ( Scheduled Area ) यादी सोबत संलग्न केली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१५१८२०११७३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai
Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.10.15 18:22:14 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)
५. प्रबंधक,मूळ न्याय शाखा,उच्च न्यायालय,मुंबई (पत्राने)
६. प्रबंधक, अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई (पत्राने)
७. प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई (पत्राने)
८. सर्व विधान सभा/परिषद सदस्य,महाराष्ट्र विधानमंडळ
९. सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई (पत्राने)
१०. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११. विभागीय आयुक्त (सर्व)
१२. जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा (सर्व)
१४. विधिमंडळ ग्रंथालय,विधानभवन,मुंबई
१५. मंत्रालयातील प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
१६. सर्व मंत्रालयीन विभागांतील सर्व आस्थापना शाखा.
१७. महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई
१८. निवडनस्ती, कार्यासन १३, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण२७१५/प्र.क्र.१०८/१३ दि.१५ ऑक्टोबर,२०१५ सोबतचे

**प्रपत्र-अ**

**अनुसूचित क्षेत्र**

| जिल्हा | तालुका | अनुसूचित क्षेत्र तालुके |
|---|---|---|
| **पालघर** | डहाणू | संपूर्ण |
| | तलासरी | संपूर्ण |
| | जव्हार | संपूर्ण |
| | मोखाडा | संपूर्ण |
| | वाडा | संपूर्ण |
| | विक्रमगड | संपूर्ण |
| | पालघर | अंशत: (१४४ गावे) |
| | वसई | अंशत: (४५ गावे) |
| **ठाणे** | भिवंडी | अंशत: (७२ गावे) |
| | मुरबाड | अंशत: (७७ गावे) |
| | शहापूर | संपूर्ण |
| **नाशिक** | पेठ | संपूर्ण |
| | सुरगाणा | संपूर्ण |
| | कळवण | संपूर्ण |
| | दिंडोरी | अंशत: (१०६ गावे) |
| | इगतपुरी | अंशत: (९३ गावे) |
| | नाशिक | अंशत: (७० गावे) |
| | बागलण | अंशत: (५७ गावे) |
| **नंदुरबार** | नवापूर | संपूर्ण |
| | तळोदा | संपूर्ण |
| | अक्कलकुवा | संपूर्ण |
| | अक्राणी | संपूर्ण |
| | नंदुरबार | अंशत: (८२ गावे) |
| **धुळे** | साक्री | अंशत: (८० गावे) |
| | शहादा | अंशत: (१४१ गावे) |
| | शिरपूर | अंशत: (६२ गावे) |
| **जळगाव** | चोपडा | अंशत: (२५ गावे) |
| | यावल | अंशत: (१३ गावे) |
| | रावेर | अंशत: (२१ गावे) |
| **अहमदनगर** | अकोले | अंशत: (९४ गावे) |
| **पुणे** | आंबेगाव | अंशत: (५६ गावे) |
| | जुन्नर | अंशत: (६५ गावे) |
| **नांदेड** | किनवट | अंशत: (१५२ गावे) |

| जिल्हा | तालुका | अनुसूचित क्षेत्र तालुके |
|---|---|---|
| **अमरावती** | चिखलदरा | संपूर्ण |
| | धारणी | संपूर्ण |
| **यवतमाळ** | मारेगाव | अंशत: (१३० गावे) |
| | राळेगाव | अंशत: (४३ गावे) |
| | केळापूर | अंशत: (१०३ गावे) |
| | घाटंजी | अंशत: (५५ गावे) |
| **गडचिरोली** | एटापल्ली | संपूर्ण |
| | सिरोंचा | संपूर्ण |
| | अहेरी | संपूर्ण |
| | धानोरा | संपूर्ण |
| | कुरखेडा | संपूर्ण |
| | गडचिरोली | अंशत: (६२गावे) |
| | आरमोरी | अंशत: (७४गावे) |
| | चामोर्शी | अंशत: (१३२ गावे) |
| **चंद्रपूर** | राजूरा | अंशत: (१८२ गावे) |

*****